धुळे जिल्ह्यातील धुळे तालुक्यातील विंचूर बोरकुंड ते नाशिक जिल्हा हद्द झोडगे कडे जाणारा रस्ता प्रजिमा म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन

सार्वजनिक बांधकाम विभाग

शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२१/प्र.क्र.६४/नियोजन-२

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक-०९ नोव्हेंबर,२०२१.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र जा. क्र./का.५/साबांप्राविना/प्रआ/दर्जोन्नत/धुळे/१३७/२०२०, दि.१२/०१/२०२१.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रान्वये धुळे जिल्ह्यातील धुळे तालुक्यातील विंचूर बोरकुंड ते नाशिक जिल्हा हद्द झोडगे कडे जाणारा रस्ता प्रजिमा म्हणून दर्जोन्नत करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, धुळे यांनी सदर रस्ता दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यावरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्याचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, धुळे यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, धुळे यांचा ठराव विचारात घेऊन धुळे जिल्ह्यातील धुळे तालुक्यातील खालील रस्ता प्रजिमा म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | विंचूर बोरकुंड ते नाशिक जिल्हा हद्द झोडगे कडे जाणारा रस्ता | ग्रामीण मार्ग -१८३ | (०/००ते ३/००) ३.०० कि.मी. | १५.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-५७ |
| | | ग्रामीण मार्ग -१८४ | (०/००ते १२/००) १२.०० कि.मी. | | |
| | एकूण | | | १५.०० कि.मी. | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील धुळे जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत १५.००० **कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (१०७८.६९०+ १५.०००) म्हणजेच **१०९३.६९० कि.मी.** इतकी तसेच ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत १५.००० **कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (७४०.४५०-१५.०००) म्हणजेच **७२५.४५० कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११११०१५०४४६००१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2021.11.10 15:07:54 +05'30'

**(ग. सं. कचरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४) जिल्हाधिकारी, धुळे.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद धुळे.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, धुळे.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) रेखाचित्र शाखा
११) निवडनस्ती.